ऊर्ध्व पैनगंगा प्रकल्पांतर्गत पुनर्वसित गावठाणांतील नागरी सुविधा कामांसाठी निधी उपलब्ध करुन देणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: अर्थसं- २०२४/प्र.क्र.९१/र-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २५ फेब्रुवारी, २०२५

वाचा -

१) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्र. आरपीए २००८/प्र.क्र. ५५०/र-१, दि. ०१.०८.२००९
२) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्र. आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि. २८.०३.२०११
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७.०४.२०१५
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. पुनर्व -२०२२/७७/प्र.क्र. ३३/र-८, दि. १९.१०.२०२२
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. पुनर्व -२०२२/७८/प्र.क्र. ३१/र-८, दि. ११.११.२०२२
६) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. पुनर्व -२०२२/७९/प्र.क्र. ३२/र-८, दि. ०७.११.२०२२
७) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. पुनर्व -२०२३/प्र.क्र. ३७/र-८, दि. ०४.०५.२०२३
८) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. पुनर्व -२०२३/प्र.क्र. ३५/र-८, दि. ०५.०६.२०२३
९) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. पुनर्व -२०२३/प्र.क्र. ३६/र-८, दि. ०४.०५.२०२३
१०) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, हिंगोली यांचे पत्र जा.क्र. जिपहिं/बांध/कावि/१५२७/२४, दि. २९.०७.२०२४

प्रस्तावना-

ऊर्ध्व पैनगंगा प्रकल्पांतर्गत हिंगोली जिल्ह्यातील पुनर्वसित गावठाणांतील नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. ४ ते ९ येथील शासन निर्णयांन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, हिंगोली यांनी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संदर्भाधीन क्र. १० येथील पत्रान्वये निधी मागणी प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

त्या अनुषंगाने, प्रस्तावाधीन प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

ऊर्ध्व पैनगंगा प्रकल्पांतर्गत हिंगोली जिल्ह्यातील पुढील तक्त्यात नमूद पुनर्वसित गावठाणांतील नागरी सुविधा कामांसाठी एकूण रूपये २,८७,५१,०८४/- (रूपये दोन कोटी सत्त्याऐंशी

लक्ष एकावन्न हजार चौऱ्याऐंशी फक्त) एवढा निधी सन २०२४-२०२५ या चालु वित्तीय वर्षात वितरित करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, ऊर्ध्व पैनगंगा प्रकल्पांतर्गत हिंगोली जिल्ह्यातील पुढील तक्त्यात नमूद पुनर्वसित गावठाणांतील पूर्ण झालेल्या नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी योजनेंतर्गत सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रूपये २,८७,५१,०८४/- (रूपये दोन कोटी सत्त्याऐंशी लक्ष एकावन्न हजार चौऱ्याऐंशी फक्त) "मागणी क्रमांक सी-१०, मुख्य लेखाशीर्ष ४७०१, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, संचालन व प्रशासन, (००) (००)(०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३, मोठी बांधकामे (४७०१ एच-७२७)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे-

(रक्कम रूपयात)

| अ. क्र. | पुनर्वसित गावठाण | नागरी सुविधा कामांचा तपशील | प्रशासकीय मान्यता रक्कम | यापूर्वी वितरित एकूण निधी | वितरित करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| **कळमनुरी तालुका** | | | | | |
| १ | महारी बु. | समाजमंदिर बांधकाम करणे | ३०,००,०००/- | १५,००,०००/- | १४,९९,२००/- |
| २ | डिग्गी | समाजमंदिर बांधकाम करणे | ३०,००,०००/- | १५,००,०००/- | १४,९७,६६२/- |
| ३ | शेनोडी | समाजमंदिर बांधकाम करणे | ३०,००,०००/- | १५,००,०००/- | १४,९८,८८६/- |
| ४ | मोरगव्हाण | समाजमंदिर बांधकाम करणे | ३०,००,०००/- | १५,००,०००/- | १४,९८,००३/- |
| ५ | खडकद खु. | नळाद्वारे पाणीपुरवठा करणे | ३०,००,०००/- | २८,४९,९४७/- | १,४९,९९७/- |
| ६ | खडकद खु. | समाजमंदिर बांधकाम करणे | ३०,००,०००/- | १७,९९,२०४/- | ११,३२,७५६/- |
| **हिंगोली तालुका** | | | | | |
| ७ | गांजापूर | नळाद्वारे पाणीपुरवठा करणे | ३०,००,०००/- | २८,४९,९४७/- | १,४९,९९७/- |
| ८ | सांडस | समाजमंदिर बांधकाम करणे | ३०,००,०००/- | २०,९८,८८८/- | ८,९९,५२३/- |
| ९ | गाडीबोरी | शाळा खोल्या, संरक्षक भिंत व अनुषंगिक कामे करणे | ४०,००,०००/- | ३५,९६,७६१/- | ३,९८,४४१/- |
| १० | गाडीबोरी | समाजमंदिर बांधकाम करणे | ३०,००,०००/- | २६,९८,७२२/- | २,९९,८५८/- |
| ११ | सावरगाव (बं) | समाजमंदिर बांधकाम करणे | ३०,००,०००/- | २६,९९,१०७/- | २,९९,९०१/- |
| १२ | बोरजा | स्मशानभूमी शेड, सी. सी. रोड, संरक्षक भिंत, पेव्हर ब्लॉक, पाणी पुरवठा करणे | ३०,००,०००/- | २२,४८,०८९/- | ७,४९,३६३/- |
| १३ | बोरजा | शाळा खोल्या, संरक्षक भिंत व अनुषंगिक कामे करणे | ४०,००,०००/- | ३५,९५,५२५/- | ३,९९,५०३/- |
| १४ | बोरजा | समाजमंदिर बांधकाम करणे | ३०,००,०००/- | १४,९८,४८४/- | १४,९७,८८५/- |
| १५ | बोरजा | सिमेंट नाली बांधकाम करणे | ४०,००,०००/- | ३५,९८,२६०/- | ३,९८,२०७/- |
| १६ | सावरगाव (बं) | सिमेंट नाली बांधकाम करणे | ४०,००,०००/- | १९,९७,७४२/- | १९,९६,९४२/- |

| अ. क्र. | पुनर्वसित गावठाण | नागरी सुविधा कामांचा तपशील | प्रशासकीय मान्यता रक्कम | यापूर्वी वितरित एकूण निधी | वितरित करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १७ | सावरगाव (बं) | शाळा खोल्या, संरक्षक भिंत व अनुषंगिक कामे करणे | ४०,००,०००/- | ३५,९६,३५१/- | ३,९७,९९६/- |
| १८ | सावरगाव (बं) | स्मशानभूमी शेड, सी. सी. रोड, संरक्षक भिंत, पेव्हर ब्लॉक, पाणी पुरवठा करणे | ४०,००,०००/- | २९,९९,१३८/- | ९,९९,७१३/- |
| १९ | सावरगाव (बं) | गाव अंतर्गत खडीकरण व सी.सी. रोड करणे | ७०,००,०००/- | ५२,४५,५९३/- | १७,४८,५३१/- |
| २० | गाडीबोरी | गाव अंतर्गत खडीकरण व सी.सी. रोड करणे | ७०,००,०००/- | ५२,४६,८३७/- | १७,४८,२४६/- |
| २१ | बोरजा | गाव अंतर्गत खडीकरण व सी.सी. रोड करणे | ६०,००,०००/- | २९,९८,६२३/- | २९,९८,६२३/- |
| २२ | सांडस | गाव अंतर्गत खडीकरण व सी.सी. रोड करणे | ५०,००,०००/- | २४,९८,१५६/- | २४,९८,१५७/- |
| २३ | सांडस | शाळा खोल्या, संरक्षक भिंत व अनुषंगिक कामे करणे | ४०,००,०००/- | १९,९८,४०५/- | १९,९८,४०४/- |
| २४ | गांजापूर | समाजमंदिर बांधकाम करणे | ३०,००,०००/- | १७,९८,९५७/- | ११,८६,६८२/- |
| २५ | गांजापूर | शाळा खोल्या, संरक्षक भिंत व अनुषंगिक कामे करणे | २०,००,०००/- | १५,९८,४४१/- | ३,८६,११०/- |
| २६ | गांजापूर | गाव अंतर्गत खडीकरण व सी.सी. रोड करणे | ३०,००,०००/- | २६,९९,३०४/- | २,४२,६५६/- |
| २७ | गांजापूर | सिमेंट नाली बांधकाम करणे | २०,००,०००/- | १७,९८,५८०/- | १,७९,८४२/- |
| **एकूण-** | | | | | **२,८७,५१,०८४/-** |

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची/अटींची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद हिंगोली/कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, हिंगोली यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन दिला जात असल्याने नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून कोणतीही परवानगी/मंजूरी घेण्याची आवश्यकता नाही.

३) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, हिंगोली यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तद्नुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर तसेच

जिल्हाधिकारी, हिंगोली यांना सत्वर सादर करावा.

४) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

५) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी .

६) सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्ष “मागणी क्रमांक सी- १०, मुख्य लेखाशीर्ष ४७०१, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, संचालन व प्रशासन, (००)(००)(०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३, मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७)” (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

७) सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्ष “मागणी क्रमांक सी- १०, मुख्य लेखाशीर्ष ४७०१, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, संचालन व प्रशासन, (००) (००)(०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३, मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७)” (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

८) मुख्य लेखाशीर्ष “मागणी क्रमांक सी- १०, मुख्य लेखाशीर्ष ४७०१, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, संचालन व प्रशासन, (००)(००)(०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३, मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७)” (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

९) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. तसेच सदर निधी संबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconciliation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

१०) संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

११) या संदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२४-२०२५ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

३. सदर आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३/विनिमय, भाग-२, दि. १७.०४.२०१५ मधील वित्तीय नियमावली भाग पहिला उपविभाग तीन परिच्छेद क्र. २७ (२) अन्वये

प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार व वित्त विभाग अनौ. संदर्भ क्र. ३२२/व्यय-१०, दि. १३.०८.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०२२५१६१९१४९४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRIYANKA DURYODHAN SABALE

Digitally signed by PRIYANKA DURYODHAN SABALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=82a9eeb92dcea9f2fe82500a27c88b4cd83e056380f6577894cc5d34aa3fcd03, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7D7D2AA1CC32E0C17255C6A14B394B29F6F4DC65747C858584EC33028A4FEF12, cn=PRIYANKA DURYODHAN SABALE
Date: 2025.02.25 16:21:01 +05'30'

**( प्रियांका दु. साबळे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन,) औरंगाबाद विभाग, छत्रपती संभाजीनगर
२. उप आयुक्त (पुनर्वसन), छत्रपती संभाजीनगर
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, हिंगोली
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली
५. कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, हिंगोली
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोली
९. जलसंपदा विभाग, कार्यासन मोप्र-२, मंत्रालय, मुंबई ३२
१०. वित्त विभाग,कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२.
११. नियोजन विभाग,कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१२. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई - ३२
१३. महसूल व वन विभाग, पी.ए.सी. कार्यासन, मंत्रालय, मुंबई ३२.
१४. निवडनस्ती कार्यासन र-८,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.